**डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजनेंतर्गत सुक्ष्म सिंचनासाठी अनुदानाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सूसिंयो-२११७/प्र.क्र.१४१/१७/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०२ ऑगस्ट, २०१७

वाचा :

१. **शासन निर्णय क्र. विघयो-२०१६/प्र.क्र.१७६/४अे, दि. ५ जानेवारी, २०१७.**

**प्रस्तावना:**

अनुसूचित जाती/नवबौध्द शेतकऱ्यांसाठी राबविण्यात येणाऱ्या विशेष घटक योजनेमध्ये सुधारणा करुन, सुधारीत योजना "डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजना" या नावाने राबविण्याचा प्रस्ताव दि.३ जानेवारी, २०१७ रोजीच्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावामध्ये, ठिबक सिंचनासाठी रु.५०,००० व तुषार सिंचनासाठी रु.२५,००० चे अनुदान प्रस्तावित करण्यात आले होते. सदर अनुदानाची रक्कम, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानास पुरक अनुदान देऊन अनुसूचित जाती/नवबौद्ध शेतकऱ्यांना ९०% अनुदान देण्याचे प्रस्तावित करण्यात आले होते. मंत्रीमंडळ प्रस्तावातील सदर मुद्याच्या अनुषंगाने चर्चेच्यावेळी, "सूक्ष्म सिंचन या घटकाची अंमलबजावणी योग्य रितीने व्हावी, याकरीता अनुदानाचे सूत्र व कार्यप्रणाली ठरविणे करीता मंत्रीमंडळाची उपसमिती गठीत करण्यात यावी. या उपसमितीच्या निर्णयाप्रमाणे अनुदानाची रक्कम लागू राहील" असे निर्देश मा.मंत्रीमंडळाने दिले.

मा. मंत्रीमंडळाने दिलेल्या निर्देशानुसार, दि.१८ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयान्वये, मा. मंत्री (कृषी) यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने केलेल्या शिफारशीनुसार डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजनेंतर्गत देय अनुदानाची मर्यादा व कार्यपद्धती निश्चित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजनेंतर्गत सुक्ष्म सिंचनासाठी द्यावयाच्या अनुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतले आहेत.

१. अनुसूचित जाती/नवबौद्ध शेतकऱ्यांसाठी राबविण्यात येणाऱ्या, डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजनेंतर्गत ठिबक सिंचनासाठी रुपये ५००००/- व तुषार सिंचनासाठी रुपये २५०००/- च्या मर्यादेत अनुदान देण्यात यावे.

२. सदर अनुदानाची रक्कम प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानास पूरक अनुदान म्हणून देऊन अनुसूचित जाती/नवबौध्द शेतकऱ्यांना ९०% च्या मर्यादेत अनुदान देण्यात यावे.

३. ज्या अनुसूचित जाती/नवबौद्ध शेतकऱ्यांची निवड प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत झाली नसेल व अशा शेतकऱ्यांनी डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजनेंतर्गत सूक्ष्म सिंचनासाठी अर्ज केला असेल, अशा शेतकऱ्यांना डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजनेंतर्गत एकूण खर्चाच्या ९०% किंवा ठिबक सिंचनासाठी रु.५०,०००/- व तुषार सिंचनासाठी रु.२५,०००/- यापैंकी जी रक्कम कमी असेल तेवढया रकमेचे अनुदान देण्यात येईल.

डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजनेंतर्गत द्यावयाच्या अनुदानाची रक्कम, प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानास पूरक अनुदान देण्यासाठी अवलंबावयाची सविस्तर कार्यपद्धती कृषि आयुक्तालयाकडून विहीत करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०२१७१९२९४४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.08.02 17:21:07 +05'30'

**( सु. सं. धपाटे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. मंत्री (कृषी), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. मंत्री (सामाजिक न्याय), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. राज्यमंत्री (कृषी), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२

५. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
७. मा. अ. मु. स. (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
८. मा. अ. मु. स. (नियोजन), नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
९. मा. सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
१०.आयुक्त कृषि , कृषि आयुक्तालय, महाराष्ट राज्य पुणे.
११.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे (१० प्रतीसह)
१२.सर्व संचालक/सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट राज्य पुणे.
१३.सर्व विभागीय कृषी सह संचालक,
१४.सर्व विभागीय आयुक्त,
१५.सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास मंडळ,
१६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१७.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१९.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०.व्यवस्थापकीय संचालक, महाबीज, अकोला,
२१.सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
२२.सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
२३.महासंचालक माहिती व जनसंपर्क सचालनालय,मुंबई.
२४.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
२५.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर
२६.सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कार्यासन अधिकारी, (कृषि) कृषि व पदुम विभाग
२७.ग्रामविकास व जलसंधारण विभाग मंत्रालय मुंबई ३२
२८. वित्त विभाग व्यय १/अर्थसंकल्प १३, मंत्रालय, मुंबई -३२
२९.नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई - ३२,
३०.सामाजिक न्याय विभाग
३१.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
३२.मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३३.निवड नस्ती.